**१०० विद्यार्थी क्षमतेचे मागासवर्गीय मुला-मुलींचे शासकीय वसतीगृह, देवगड, जि.सिंधुदूर्ग या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बीसीएच-२०१६/प्र.क्र.५८१/बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १२ जुलै, २०१८.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२००५/ प्र.क्र.५२४/ मावक-४ दि.२८.०६.२००७.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२००७/ प्र.क्र.३०/ मावक-४ दि.१७.०२.२००७.
३) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/शिक्षण/बांधकामे/मुलींचे शावगृ देवगड जि.सिंधुदूर्ग/सुधा.प्रशा./का-५/१७-१८/३०९०, दिनांक ०३.११.२०१७

प्रस्तावना :-

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा व तालुका स्तरावर मागासवर्गीय मला-मुलींसाठी १०० विद्यार्थी क्षमतेची नवीन १०० शासकीय वसतीगृहे तसेच विभागीय ठिकाणी १००० विद्यार्थी क्षमतेची ७ (२५० क्षमतेची प्रत्येकी ४ अशी एकूण २८) सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यामध्ये देवगड, सिंधुदूर्ग येथील मागासवर्गीय मुलींच्या शासकीय वसतीगृहास मंजूरी देण्यात आली असुन संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये १०० विद्यार्थी क्षमतेच्या शासकीय वसतिगृहाच्या इमारत बांधकामास प्रत्येकी रु.३,२६,९२,५००/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तथापि सलोह संकल्पनातील वाढीमुळे, जमिनीच्या उंच सखलपणामुळे आवश्यक खोदकाम, जोते पातळी राखण्यासाठी आवश्यक बांधकाम इ. बाबींमुळे सदर कामाच्या खर्चात वाढ झाली असल्याने सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित सुधारित अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेस्तव सादर करण्यात आले आहे. अंदाजपत्रक त्याअनुषंगाने सार्वजनिक बांधकाम उपविभाग, देवगड, जि.सिंधुदूर्ग यांनी तयार केलेले व आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय,पुणे यांनी त्यांच्या संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये सादर केलेल्या मागासवर्गीय मुलींचे शासकीय वसतीगृह, देवगड, जि.सिंधुदूर्ग या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या रुपये ६,७१,०५,६००/- (रुपये सहा कोटी ऐकाहत्तर लाख पाच हजार सहाशे फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी मागासवर्गीय मुलींचे शासकीय वसतीगृह, देवगड, जि.सिंधुदूर्ग या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाचे सुधारित प्रशासकीय मान्यतेचे रुपये ६,७१,०५,६००/- (रुपये सहा कोटी ऐकाहत्तर लाख पाच हजार सहाशे फक्त) इतक्या रकमेचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यतेसाठी शासनाकडे पाठविले होते. सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणित केल्यानुसार मागासवर्गीय मुलींचे शासकीय वसतिगृह, देवगड या वसतिगृह बांधकामास रुपये ६,७१,०५,६००/- (रुपये सहा कोटी ऐकाहत्तर लाख पाच हजार सहाशे फक्त) इतक्या रकमेस खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर काम सुधारित प्रशासकीय मान्यता दिलेल्या रकमेतच पुर्ण करणे अनिवार्य राहिल.
२. तांत्रिक मान्यता देण्यापुर्वी अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याचे साक्षांकन घेण्यात यावे.
३. मुळ प्रशासकीय मान्यता आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोर पालन करण्यात यावे.

२. सदर मागासवर्गीय मुलींच्या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त करुन, विहित नियमानुसार अटी व शर्ती निश्चित करुन ई-निविदा प्रसिध्द करण्याची कार्यवाही कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग सिंधुदूर्ग यांनी तात्काळ करावी.

३. या वर होणारा खर्च मागणी क्र. एन-४, मुख्य लेखाशिर्ष ४२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती आणि इतर मागासवर्ग यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च, २७७-शिक्षण, पंचवार्षिक योजनां अंतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०३) मागासवर्गीय मुलांमुलींसाठी शासकीय वसतीगृह बांधणे (४२२५ ०४८१), ५३-मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, सिंधुदूर्ग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०७१२१४३६४३४५२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2018.07.12 14:37:13 +05'30'

**(अ.कों.आहिरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण, पुणे

२) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.

३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे

४) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सिंधुदूर्ग/रत्नागिरी.

५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सिंधुदूर्ग.

६) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.

७) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई.

८) सहायक आयुक्त, समाजकल्याण, सिंधुदूर्ग

९) जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग.

१०) निवडनस्ती.